संगणक संकेतांक क्र.201012221920370001

विशेष आर्थिक क्षेत्रांचा विकास आणि कार्यान्वयन यासंदर्भातील विविध अडिअडचणी जलद गतीने सोडविण्यासाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्तीप्रदान समितीची स्थापना करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्र. विआक्षे २००७/प्र.क्र.१८४९ /उद्योग-२,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २४ फेब्रुवारी, २००९

**प्रस्तावना :-**

विशेष आर्थिक क्षेत्रांच्या वाढीसाठी व ते चांगल्या पध्दतीने कार्यान्वित व्हावेत आणि अपेक्षित उद्दीष्टे साध्य व्हावीत यासाठी केंद्र शासनाने विशेष आर्थिक क्षेत्राबाबत अधिनियम व नियम तयार केले आहेत. केंद्र शासनाकडून मान्यता मिळालेल्या विशेष आर्थिक क्षेत्रांची संख्या इतर राज्यांच्या तुलनेत महाराष्ट्रात सर्वाधिक आहे. त्याद्वारे राज्यात भरीव गुंतवणूक व रोजगार अपेक्षित आहे. मान्यताप्राप्त विशेष आर्थिक क्षेत्रांपैकी अंदाजे ३० टक्क्यांपेक्षा अधिक विशेष आर्थिक क्षेत्र अधिसूचित करण्यात आलेली आहेत. या पार्श्वभुमिवर महाराष्ट्रातील विशेष आर्थिक क्षेत्रांचे प्रकल्प तातडीने कार्यान्वित व्हावेत यासाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्तीप्रदान समिती स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

विशेष आर्थिक क्षेत्रांना प्रोत्साहन देणे, विकास करणे व कार्यान्वित करणे यासंदर्भात उद्भवणाऱ्या अडीअडचणी दूर करण्यासाठी आणि केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या विशेष आर्थिक क्षेत्रांची अंमलबजावणी तातडीने सुरु होण्यासाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्तीप्रदान समिती स्थापन करण्यात येत आहे. प्रस्तुत समितीमध्ये खालीलप्रमाणे सदस्य असतिल :-

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव (गृह) | सदस्य |
| ३) | प्रधान सचिव (उद्योग) | सदस्य |
| ४) | प्रधान सचिव (नगर विकास-१) | सदस्य |
| ५) | सचिव (ऊर्जा) | सदस्य |
| ६) | सचिव (पर्यावरण ) | सदस्य |
| ७) | सचिव (कामगार) | सदस्य |
| ८) | महाराष्ट्रातील केंद्र शासनाच्या कोणत्याही २ विशेष आर्थिक क्षेत्राचे विकास आयुक्त | सदस्य |
| ९) | प्रधान सचिव (वित्त ) | विशेष निमंत्रीत |
| १०) | विकास आयुक्त (उद्योग) | सदस्य सचिव |

शक्तीप्रदान समितीचे कार्य :-

अ) आंतर-विभागीय किंवा आंतर-संस्थात्मक समन्वय, कायदा व सुव्यवस्था इत्यादि बाबींसह, राज्यातील विशेष आर्थिक क्षेत्रांची वृध्दी, विकास आणि कार्यशील होण्यासंदर्भातील विविध अडिअडचणी जलद गतीने सोडवून विशेष आर्थिक क्षेत्र कार्यान्वित करण्यासाठी शक्तीप्रदान समिती पर्यवेक्षण करेल. शक्तीप्रदान समितीने याबाबत घेतलेले निर्णय अंतिम व सर्व संबंधित संस्था व प्राधिकरणांना बंधनकारक असतिल.

ब) शक्तीप्रदान समिती, आवश्यकता असल्यास, राज्य शासनाकडून आवश्यक असलेल्या पायाभूत सुविधा उपलब्ध होण्यासाठी मदत करेल.

क) केंद्र शासनाने नेमलेल्या विकास आयुक्त (विशेष आर्थिक क्षेत्र ) यांना विशेष आर्थिक क्षेत्रासाठी एक खिडकी परवाना पध्दत राबविणे शक्य व्हावे यासाठी आवश्यक ते राज्य शासनासंदर्भातील अधिकार प्रदान करण्यासाठी शिफारशी करेल.

ड) सदर समिती आवश्यकतेनुसार इतर सदस्यांना निमंत्रीत करु शकेल.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने, वित्त विभागाच्या दि.३.८.२००७ च्या अनौपचारीक संदर्भान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०२१७१२५९२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

छायाअग्निहोत्री

( छाया अग्निहोत्री )
कक्ष अधिकारी

प्रति,
१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. राज्यमंत्री (उद्योग), मंत्रालय, मुंबई
४) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (उद्योग), मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव ( नगर विकास ), मंत्रालय, मुंबई
९) सचिव (पर्यावरण ), मंत्रालय, मुंबई
१०) सचिव (ऊर्जा ), मंत्रालय, मुंबई
११) सचिव (कामगार ), मंत्रालय, मुंबई
१२) विकास आयुक्त (सीप्झ), अंधेरी, मुंबई
१३) व्यवस्थापकीय संचालक, सीडको, मुंबई
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ
१५) विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई.
१६) सर्व मंत्रालयीन विभाग
१७) निवड नस्ती (उद्योग-२)

-----